सन २००१-२००२ या वित्तिय वर्षाकरिता बंदी मजूरी आहार खर्च व इतर खर्च या लेखाशिर्षाखाली वाढीव अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र.बीजीटी -०१२१/८(४१)/पीआरएस-२,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,दिनांक : ७ जानेवारी, २००२.**

**वाचा :- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र.बीजीटी २००१-२००२/क्र ४, दिनांक ६ डिसेंबर २००१.**

**२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१**

<u>शासन निर्णय</u> :- नियमित दराने मिळणा-या गहू व तांदळाचे शासनाने वाढविलेले दर, खाद्यवस्तूंच्या दरात झालेली वाढ, शासनाकडून मिळणारे अपुरे अनुदान यामुळे आहार खर्च याबाबीखालील अनुदान अपुरे पडते. तसेच तुरुंग विभागातील " इतर खर्च " या बाबीखाली जे अनुदान मिळते त्यामध्ये प्रामुख्याने बंद्यांच्या औषधावरील खर्च, कारागृहातील स्वच्छता, पाणीपट्टी बिले, विजेचा खर्च, उपहारगृहात लागणा-या वस्तूंचा खर्च आदी आवश्यक बाबींचा समावेश होतो. त्यामुळे शासनाने सुचविलेले काटकसरीचे धोरण अंमलात आणूनही बंद्यांचे आरोग्य, सुरक्षितता इत्यादीशी संबंधित बाबी वरील टाळता न येणारा खर्च असल्यामुळे इतर खर्च याबाबीखालील उपलब्ध अनुदान फारच अपुरे पडत आहे. त्यामुळे कारागृह महानिरीक्षक यांचेकडून सन २००१-२००२ या वित्तिय वर्षाकरिता वाढीव अनुदान मिळणेबाबतचा प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासनाने आता या प्रकरणी कारागृह विभागाकरिता सन २००१-२००२ या वित्तिय वर्षाकरिता " २०५६-तुरुंग " या मुख्यलेखाशीर्षाखाली " १०२-तुरुंग निर्मिती वस्तु " या उपशीर्षाखाली मंजूर झालेल्या रु. ७/-कोटीच्या अनुदानामधून रु.३ /-कोटी इतके अनुदान लेखाशीर्ष " २०५६ " तुरुंग,१०१-(एक) मध्यवर्ती कारागृह व १०२ (दोन) जिल्हा कारागृह " या उपशिर्षाकडे पुनर्विनियोजन करुन तातडीची गरज म्हणून खर्च करण्याकरिता रु. ३ कोटी परावर्तित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३.	यासाठी होणारा खर्च सन २००१-२००२ या वित्तिय वर्षाकरिता बंदयांची मजूरी, आहार खर्च व इतर खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००१-२००२ या मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४.	हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या संमतीने तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर १११५/२००१/व्यय-८ दिनांक १८.१२.२००१ व अर्थोपाय शाखा संदर्भ क्र.१२५५/अर्थ-१० दिनांक २०.१२.२००१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( गु. ज. कुलकर्णी )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक ,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व कारागृह उपमहानिरीक्षक
सर्व जिल्हा कारागृह अधीक्षक.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
वित्त विभाग,व्यय - ८,मंत्रालय,मुंबई, ३२.
नियोजन विभाग (का.१४७५),मंत्रालय,मुंबई
निवडनस्ती,पीआरएस-२.